

**महाराष्ट्र शासन**

**सामान्य प्रशासन विभाग,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,

मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

दूरध्वनी क्रमांक२२-७९४२५७ Email ID : Desk 14b.gad-mh@gov.in

.................................................................................................................................

क्रमांक : कअनि-११२१/प्र.क्र.३०/१४-ब दिनांक : ०७ डिसेंबर २०२१

प्रति,

सह/उप सचिव (आस्थापना)
सर्व मंत्रालयीन विभाग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२

**विषय :** सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपहारगृहाच्या आस्थापनेवरील “प्रशासन अधिकारी” या पदावर प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्याबाबत.

**संदर्भ :** सा.प्र.वि.शा.नि.क्र.संकीर्ण-२०१७/प्र.क्र.१२०/कार्या-१४, दि.३१.०८.२०१७

महोदय/महोदया,

संदर्भाधीन शासन निर्णयान्वये मंत्रालयीन संवर्गातील अधिकारी/कर्मचारी यांच्या प्रतिनियुक्तीबाबत कार्यपध्दती विहीत करण्यात आली आहे. सदर कार्यपध्दतीनुसार सामान्य प्रशासन विभागाच्या अधिपत्याखालील मंत्रालय उपहारगृहाच्या आस्थापनेवरील “प्रशासन अधिकारी” हे पद मंत्रालयीन कक्ष अधिकारी संवर्गातून प्रतिनियुक्तीने भरावयाचे आहे. त्यानुसार सदर पद प्रतिनियुक्तीने भरण्यासाठी मंत्रालयीन विभागांतील कक्ष अधिकारी संवर्गातील अधिकाऱ्यांकडून इच्छुकता मागविण्यात येत आहे.

२. सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर पत्र आपल्या विभागाच्या आस्थापनेवरील कक्ष अधिकाऱ्यांच्या तात्काळ निदर्शनास आणावे. त्यानुसार प्रतिनियुक्तीसाठी इच्छुकता दर्शविलेल्या कक्ष अधिकाऱ्यांची सोबतच्या विवरणपत्रातील माहिती विभागाच्या सचिवांच्या मान्यतेने या विभागास दि.१५.१२.२०२१ पर्यंत उपलब्ध करुन द्यावी. इच्छुक कक्ष अधिका-यांनी दर्शविलेली इच्छुकता मागे घेता येणार नाही. तसेच कोणीही कक्ष अधिकारी इच्छुक नसल्यास तसेही कळविण्यात यावे.

३. सदर पत्राची प्रत महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आली असून त्याचा संगणक संकेतांक २०२११२०७११५९३२४६०७ असा आहे. सदर पत्र डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

**आपला,**

Gajanan Bhimrao Gurav

Digitally signed by Gajanan Bhimrao Gurav
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=General Administration Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=8a5b973b0795ae988a7c005050f9180a8021798a5c1ed41ada8a72725a47b4f0, serialNumber=54b11b1ccbdc577d71dce3b313c3fef5dc2ad659e360f73b682d6b6fccb8aecf, cn=Gajanan Bhimrao Gurav
Date: 2021.12.07 12:03:55 +05'30'

**(ग.भि.गुरव)**

**अवर सचिव,महाराष्ट्र शासन**

## प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यासंदर्भात विहीत करण्यात आलेले विवरणपत्र

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अधिकाऱ्याचे संपूर्ण नांव | | |
| २ | पदनाम/सध्या घेत असलेली वेतनश्रेणी | | |
| ३ | सध्याच्या कार्यालयाचे नाव, पत्ता व दूरध्वनी क्रमांक | | |
| ४ | जन्मदिनांक | | |
| ५ | शैक्षणिक अर्हता | | |
| ६ | भ्रमणध्वनी क्रमांक | | |
| ७ | ज्या पदावर प्रतिनियुक्तीने जाण्यास इच्छुक आहे ते पद | | |
| ८ | मागील ५ वर्षांच्या गोपनीय अहवालाच्या छायाप्रती (मूळ गोपनीय अहवाल पाठवू नयेत) | | |
| ९ | ५०/५५ व्या वर्षी पुनर्विलोकन केले आहे का? (लागू असल्यास) | | |
| १० | मत्ता व दायित्वे सादर केली आहेत काय? | | |
| ११ | संबंधीत अधिकाऱ्यांस यापूर्वी प्रतिनियुक्ती दिली असल्यास तपशिल (पद व कालावधी) (प्रतिनियुक्तीचा एकूण कालावधी १० वर्षांपेक्षा जास्त नसावा) | दिनांकपासून ते दिनांकापर्यंत | पद/प्रतिनियुक्तीचे ठिकाण |
| | | | |
| | | | |
| | | एकूण कालावधी | |
| १२ | मागील प्रतिनियुक्तीवरुन परत आल्याच्या दिनांकापासून ३ वर्षे पूर्ण झाली आहेत का? | | |
| १३ | संबंधीत अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी सुरु अथवा प्रस्तावित आहे किंवा कसे? तसेच त्यांच्याविरुध्द लाचलुचपत गुन्ह्यासंदर्भातील प्रकरण, फौजदारी प्रकरण प्रलंबित आहे किंवा कसे, | | |
| १४ | संबंधीत अधिकाऱ्याची निवड झाल्यास त्यास तात्काळ कार्यमुक्त करण्यात येईल किंवा कसे. | | |

*****